जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अस्थायी ०२२३/प्र. क्र.३७/कार्यासन-११**
पाचवा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २१ फेब्रुवारी २०२३.

**वाचा:** १. शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१,वित्तीय सुधारणा, दि.१०/९/२००१.
२. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग,क्र.अस्थायी ०२२२/प्र.क्र.२५/कार्यासन ११, दि.८/९/२०२२
३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.८/२/२०२३
४. जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांचे पत्र म. जा. क्र. प्रशा. ब.४/ ५३९/२०२२,दि.२५/१/२०२३

**प्रस्तावना :-**

जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांच्या आस्थापनेवरील १६५ अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये दि. १/९/२०२२ ते दि.२८/२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या दि.८/२/२०२३ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतू, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. १/३/२०२३ते दि. ३१/८/२०२३पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांच्या आस्थापनेवरील १६७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांनी संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार२ नवीन सह दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) निर्माण करण्यात आली असून त्याकरीता प्रत्येकी ५ अशी तात्पुरती सहाय्यभूत कर्मचारीवृंदाची पदे निर्माण करण्यात आली आहेत. तसेच २ सह दिवाणी न्यायालये बंद झाल्याने त्यांची ८ पदे कमी झाली आहेत. त्यानुसार त्यांच्या आस्थापनेवरील पुढील तक्यात नमूद केलेली १६७ अस्थायी पदे दि.१/३/२०२३ ते दि.३१/८/२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | अधिक्षक | २ |
| २ | सहायक अधीक्षक | १४ |
| ३ | लघुलेखक (उच्च श्रेणी) ग्रेड -१ | ३ |
| ४ | लघुलेखक (उच्च श्रेणी) ग्रेड-२ | ४ |
| ५ | लघुलेखक इंग्रजी (निम्न श्रेणी) ग्रेड-३ | २ |
| ६ | लघुलेखक- मराठी (निम्न श्रेणी) ग्रेड-३ | १ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | १३ |
| ८ | कनिष्ठ लिपिक | ६२ |
| ९ | वाहनचालक | २ |

| | | |
|---|---|---|
| १० | प्रमुख बेलिफ | १ |
| ११ | बेलिफ | १२ |
| १२ | पुस्तक बांधणीकार | १ |
| १३ | शिपाई | ४४ |
| १४ | वॉचमन | १ |
| १५ | पुर्णवेळ सफाई कामगार | १ |
| १६ | कंत्राटी पहारेकरी | २ |
| १७ | कंत्राटी सफाईकामगार | २ |
| **एकूण पदे** | | **१६७** |

२. यासाठी होणारा खर्च " मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान, १०५ दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश,(०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (दत्तमत) (अनिवार्य) (२०१४ ०१७२)" या लेखाशिर्षांतर्गत ०१- वेतन खाली सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.८/२/२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२७१८५०५९८२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, pseudonym=A05C54A04D3293F61521D5E463E799884D63F286, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2023.02.27 18:54:57 +05'30'

**( हेमांगी शेट्ये )**
कार्यासन अधिकारी

**प्रत:-**

१) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.

२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय रत्नागिरी.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.

४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.

५) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी,

६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

७) वित्त विभाग, व्यय-५ / आ.पु.कक्ष /अर्थसंकल्प ११,मंत्रालय, मुंबई.

८) विधी व न्याय विभाग, कार्या-२०/कार्या. २३,मंत्रालय, मुंबई.

९) निवडनस्ती (कार्यासन ११)